नवनाथ भक्तिसार अध्याय सोळावा

गोरक्षनाथ आणि कानिफनाथ यांचा हिमालय मधील उग्र तपश्चर्येची कालावधी संपल्यानंतर यथोचित उद्यापन झाल्यानंतर दोघे गुरुदर्शनासाठी अधीर झाले होते. विशेष म्हणजे या दोघाचेही तप वेगवेगळया ठिकाणी सुरु होते परंतु एकमेकांना त्याची कल्पनाही नव्हती. वस्तुतः श्रीशिवाचे या दोघांवरही बारकाईने लक्ष ठेवले होते. पण एकमेकांच्या तपा विषयी तपास्थाना विषयी आणि भविष्यातील घडणाऱ्या गोष्टींसाठी गुप्तताही पाळली होती तर तपाचरणानंतर गुरूंचा शोध आणि आशीर्वाद घेण्यासाठी निघाले पण विसंगती अशी की उत्तर हिंदुस्थानातील काशी, प्रयाग गया या ठिकाणी कानिफ जालिंदरनाथांना शोधात होते. आणि दक्षिण मध्ये हिंदुस्थानात गोरक्ष गुरु मच्छिंद्रनाथांच्या शोधासाठी भटकंती करिती होते पण हे शिष्योत्तम जिथे गुरु आहेत तेथे न जाता विरुद्ध दिशेत शोध घेत होता हीच ती विसंगती. गोरक्षाची कानिफाच्या गुरूशी मच्छिंद्रनाथानंशी स्त्रीराज्यात यथोचित भेट झाली. स्त्रीराज्यात प्रवेश करताना मात्र पवनसुत मारुतीरायांशी नाहक गैरसमजुतीमुळे संघर्ष करावा लागला पण वायूदेव आणि सागराच्या मध्यस्थीने गैरसमज दूर झाले हा वृतांत आपण गत अध्यायात वाचला.

स्त्रीराज्याचे राजधानीचे शहर; श्रीगडमुंड निवासीत महाराणी मैनाकिनी आणि महाराज मच्छिंद्रनाथांनी, तीर्थाटनाच्या निम्मित्ताने स्त्रीराज्यात आलेल्या कानिफनाथ आणि त्यांचा शिष्यवृंदाचे शाही स्वागत केले होते. आणि राजेशाही आतिथ्यात त्यांची बडदास्त ठेवली होती पण हे करीत असतांना ते प्रसन्न चित्त नव्हते. “आज ना उद्या कानिफ स्वदेशात जाणार आणि तेथे त्याची आणि गोरक्षाची भेट अपरिहार्य आहे. त्यावेळी गोरक्षाला हा सर्व काही सांगणार ह्यात शंकाच नाही. माझा ठाव ठिकाणा कळताच गोरक्ष येथे येऊन मला घेऊन जाईल!” या कुशंकेने मच्छिंद्रनाथांचे स्वस्थ हरवले आणि ते चिंतातूर झाले. “गोरक्ष नावाचा माझा कुणी शिष्य आहे हे त्याला सांगू नये; त्या पेक्षा हा जर येथेच कायमचा स्थायिक झाला तर प्रश्नच संपला म्हणून त्याचे राजशाही आतिथ्य करून येनकेन प्रकारे त्याला मोहात पाडले पाहिजे. वाशिकारणाने हा मोहवश झाला, रमला की माझ्या चिंता दूर होतील." असा विचार महाराजांनी महाराणी मैनाकिनीस बोलून दाखविला आणि त्याप्रमाणे कानिफनाथ आणि शिष्य मंडळीवर वशीकरण करणासाठी जाळे पसरले.

दाम आणि काम ही फार मोठी घातक अशी मोहिनी असल्याने प्रथमतः कामिनींचा पाश टाकण्यात आला. तारुण्याने बहरलेल्या सौंदर्यवती कानिफनाथांच्या शिबिरात पाठविण्यात आल्या. त्यांच्या लावण्याचे वर्णन काय करावे; कामनिय देहावरचे उभार अवयव, पोवाल्यांप्रमाणे अधर, डाळींबाच्या दाण्या प्रमाणे सुंदर दंतपंक्ती, पानाचा विडा खाल्या नंतरची लालेलाल जिव्हा, तेजस्वी चेहेरा, पुरुष तत्वाला आव्हान देणाऱ्या मादक आणि कामुक हावभाव! त्यांचे ते रूप पाहून जपी, तपी, साधू, संन्याशी कामासक्त होतील. जपतपाचा विसर पडेल. प्रत्येक्ष कामदेवाला सुद्धा कामवासना निर्माण होईल अशा देखण्या ललनांनी कानिफनाथावर जाले फेकून त्यांत बद्ध करण्याचा प्रयत्न सुरु केला. तथापि महायोगी कर्णकानिफावर त्याचा लवमात्र ही परिणाम झाला नाही. कामवासनेवर विजय मिळविलेला जोगी बधणार नाही, हे लक्षात आल्यावर त्यांच्या शिष्यवृंदावरही असाच वशीकरणाचा प्रयोग झाला. पुन्हा पुन्हा प्रयत्न करूनही सातशेपैकी एकही शिष्य विचलित झाला नाही ह्याचा प्रत्यय आला. श्रम वाया गेले आणि नैराश्य आले. असा एक महिना उलटून गेला, एकेदिवशी कानिफनाथ हे महाराज मच्छिंद्रनाथांचा निरोप घेण्यासाठी भेटीस गेले. आणि म्हणाले; “महाराज! आता आम्हास मायभूमीत जाण्याची परवानगी द्यावी.”

“अवश्य! असे महाराजांनी निरोप समारंभ आयोजित केला. अगणित संपत्ती देऊन त्यांच्या सत्कार करण्यात आला, सुवर्ण, रत्ने, मोती, तसेच अनेक हत्ती घोडे, उंट, तंबू, कनाती, राहुट्या इत्यादी त्यांचा प्रवास सुखाचा होण्यासाठी दिल्याच शिवाय एक कोस अंतरापर्यंत स्वतः त्यांना सोडण्यासाठी ही गेले. आदराने एकमेकांना वंदन करून निरोप दिला.

सातशे शिष्यांचा लवाजमा गेऊन मजल दरमजल करीत राजयोगी कानिफनाथ गौड बंगालात आले. ज्या ज्या गावात जात तेथे त्यांचे भव्य स्वागत होत असे. लोक त्यांच्या भजनी लागत आणि नाथ त्यांना आपदामुक्त. गावोगावचे लोक त्यांना आग्रहाने घेऊन जात. जिकडे तिकडे नाथांची प्रसिद्धी झाली. दशदिशांत नाथपंथांचा लौकिक उंचावला.

हेलापट्टणात, राजा गोपीचंदाच्या कानावर हा वृत्तांत गेल्यावर राजा सावध झाला. आपल्या राज्याकडे खरोखरच असा कोणी राजयोगी येत आहे, याचा शोध घेण्यासाठी राजाने गुप्तचर रवाना केले. गुप्तचरांनी आणलेला वृतांत म्हणजे, “कानिफनाथ नावाचे महान गणले जाणारे तपस्वी योगी आहेत. त्यांच्या समवेत अफाट शिष्य समुदाय आहे. अग्रभागी नाथपंथांचा ध्वज घेतलेले पथक, त्यामागे शिबिरे, त्यामागे शिष्य समुदाय, मागे राजयोगी कानिफनाथांची पालखी आणि हत्ती, घोडे, उंट, असा लवाजमा वाटचाल करीत आहे. मोठे वैभवशाली, वैरागी तपस्वी आणि अवतारी सिद्ध योगी आहेत. चिंतेचे कारण नसावे.” गुप्तचरांकडून राजाची खात्री पटविण्यात आली.

जगन्नाथपुरीचे दर्शन घेऊन श्रीगुरुच्या शोधासाठी गोरक्षनाथ बंगाल देशाकडे वळले होते. भ्रमण करीत असतांना मार्गावरील अरण्यात कानिफनाथ आणि त्यांचा शिष्य परिवार दृष्टीस पडला. सामोरासोर आल्यावर दृष्टीभेट होताच दोघांनीही एकमेकांना, “आदेश” म्हणून सन्मानदर्शक नमस्कार केला. कानिफनाथांनी सर्वांना थांबण्याची आज्ञा केली. स्वतः पायउतार झाले, जमिनीवर भरजरी गालीचा अंतरला आणि त्यावर गोरक्षनाथासह आसनस्थ झाले. म्हणाले; “नाथपंथी महाराज! आपली ओळख सांगा, तसेच आपले श्रीगुरु कोण? कृपया परिचय द्यावा.”

गोरक्षनाथ उत्तरादाखल म्हणले, “मी जती मच्छिंद्र ह्यांचा शिष्य गोरक्ष आहे...” अशी प्रस्तावना करीत मच्छिंद्रच्या जन्मापासूनचा संपूर्ण इतिहास निवेदन केला, आणि विचारले; “आता योगीराज! आपली ओळख सांगून उपकृत करावे!” ह्यावर कानिफनाथांनी जती जालिंदरच्या जन्मापासूनचा पूर्वातिहास कथन केला. ते ऐकून दोघांना ही आनंद झाला. प्रसन्नतेने सुसंवाद चालला असतांना कानिफनाथांनी विचार केला की दोघांच्याही गुरूंना दत्तकृपेची कृपादृष्टी लाभली आहे. पाहूया तरी कोण किती खोल पाण्यात आहे? त्यांच्या दृष्टीला पिवळा जर्द रसाळ पाडाच्या आंब्यांनी लगडलेले आम्रवन दिसले. हर्षभरात ते म्हणाले, “अहाहा! किती सुंदर आमराई आहे. मधुर, रसाळ आम्रफळांच्या भाराने वृक्षशाखा नम्र झाल्या आहेत असली अमृतमय फळे खाण्याची इच्छा होत आहे. थोडीशी उपहारासाठी मागवू का?”

गोरक्षनाथ म्हणाले; “नको, नको. कानिफनाथ कशाला तसदी घेता?”

“त्यात कसली तसदी? आता शिष्यांना पाठवून मागवून घेतो.” कानिफनाथ उत्तरले.

“त्यांना तरी कशाला त्रास ते आता जवळ आहेत म्हणून आणतील पण ते नसल्यावर काय? त्याकरिता पर्याय म्हणजे सद्‌गुरू कृपेने प्राप्त झालेल्या विद्‌येचा वापर करून आम्रफळे तोडून आणावीत आणि आत्मा संतुष्ट करावा.” असा प्रस्ताव गोरक्षनाथांनी दिला.

कानिफ म्हणाले, "अवश्य गोरक्षनाथ! आपली मनोकामना पूर्ण केली जाईल गुरूंच्या कृपेने मिळालेल्या विद्येचा वापर करून, बसलो आहे त्याच स्थानावर पक्वफळे तोडून आणतो, आता पहा!" असे म्हणून चिमुटभर भस्म विभक्तास्त्र आणि आकर्षण अस्त्र सिद्ध करून सोडताच केवळ पक्वफळे पुढ्यात येऊन पडली. शिष्य मंडळीसह सर्वांनी मनमुराद आंबे खाल्ले. तृप्तीचा ढेकर देऊन आपली वदने आणि हात स्वच्छ केले. गुरुजींचा चमत्कार पाहून शिष्य मंडळी ही भारावली आणि एकमेकांत चर्चा करून त्यांची स्तुती केली.

गोरक्षनाथांनी विचार केला की कानिफाने त्याचा पराक्रम दाखविला आहे. आता आपण ही आपला चमत्कार दाखवावा. "कानिफनाथजी! आपण आमचा एवढा पाहुणचार केला आहे; तर त्याची परतफेड करण्याची आम्हास संधी द्यावी."

कानिफनाथ म्हणाले; "ठीक आहे. जशी आपली इच्छा." मग गोरक्षनाथांनी विभक्तास्त्र आणि आकर्षणशक्ती वापरून दूरच्या आमराईतील रसाळ आणि पक्व फळांची रास लावली. ती गोड आणि अमृतमय रसाळ फळे खाऊन रसना तृप्त झाली. अगोदरच चवीने मनोसोक्त खाल्ल्यामुळे बरीच फळे शिल्लक राहिली. तोंड हात धुतल्यावर पुन्हा बैठकीत बसल्यावर गोरक्षनाथ म्हणाले; "पुष्कळ फळे शिल्लक राहिली आहेत ही वाया घालविण्याऐवजी पुन्हा पहिल्यासारखी झाडाला सजीव करावी." ह्यावर कानिफनाथ म्हणले; "असे करणारा कोणी ब्रह्मदेवाचा पुत्र अस्तित्वात नाही." ह्यावर गोरक्षनाथ म्हणाले; "का नाही? जो निस्सीम गुरुभक्त आहे; त्याला काय असंभव आहे? गुरुकृपेने तो दुसरा ब्रह्मदेवही निर्माण करील, मग ही त्रे शुल्लक बाब आहे जो वसुंधरेला उचलू शकतो, त्याला पर्वताचे ओझे काय वाटणार? जो सूर्याच्या तेजाला शांत करू शकतो त्याच्यापुढे आगीच्या ठिणगीची तुलना कशी होईल? जो सप्तसागर प्राशन करू शकतो त्याच्या पुढे खळग्यातील पाण्याची भीती कशी असेल? बृहस्पतीसम ज्ञानी असणारा अज्ञानी पुढे कधी झुकेल काय? जो आपल्या पराक्रमाने दुधाच्या सागराची निर्मिती करण्याची त्याची क्षमता आहे तो ताकासाठी भिक्षा मागेल का? केवळ कृपा दृष्टीने तो दगडाचा परीस करू शकतो तो सोन्यायाचक होईल का?" ज्याच्या जीव्हाग्रहावर सकल देवता विराजमान आहेत तो भूतांना शरण जाईल का? अहो; ब्रह्मच काय परंतु ब्रह्मानंदाचा निर्माता सुद्धा गुरुकृपेने घडवू शकतो; ही गुरुकृपेचा महिमा आहे. नाहीतर घराची दैना फिटेना आणि बैलासारखी हमाली सुटेना, मग नाहक प्रौढी काय कामाची?" हे ऐकताच, आगीच्या निखाऱ्यावर तूप सोडून भडका उडवा, त्याचप्रमाणे रागाचा भडका उठून कानिफनाथ क्रोधीत होऊन म्हणाला; "होय, होय! जाणतो मी, तुला आणि तुझ्या गुरूला ही जाणतोय, जाऊन बघ; नरकात पिचत पडला आहे योगी म्हणून घ्यायचे आणि कर्माचे भोग भोगायचे. स्त्री राज्यच भोगतोय. जगाला सांगावायासाठी जितेंद्रिय आणि वास्तवात भोगेंद्रिय. जाऊन पहा; मीननाथ नावाचा मुलगा झाला आहे. कशाला व्यर्थ वल्गना करतोस? तुझा गुरूच हमाली करीत असल्याने तुझे दारिद्र्य कोण संपवणार? आता फुकाचा बडेजाव सोडून निघून जावेस."

गोरक्षनाथ ही क्रोधीत होत म्हणाला; "हे भ्रष्टा! फारच अकलेचे तारे तोडलेस. तुझा गुरु किती पराक्रमी आहे हे माहित आहे का? दहा वर्षांचा काळ उलटला आहे, तुझ्या गुरूला बंदीवान होऊन, सामर्थ्यहीन अवस्थेत दीनवाणा होऊन नरकात पिचत पडला आहे. गौड बंगालातील हेलेपट्टणाचा राजा गोपीचंद हा पक्का वस्ताद प्रतीस्पर्धी भेटला आणि घोड्यांच्या लिदीच्या खोल खड्ड्यांत गाडले." यावर कानिफनाथ उत्तरले, "माझा गुरु असा निर्बल नाही, तो तर सकल ब्रह्मांड हलवू शकेल असा आहे, साक्षात शिवाचे अस्त्र त्याच्या हातात आहे. त्यांनी अष्टभैरव, देव, दानव, ह्यांना पराभूत केले आहे. प्रत्येक्ष महाबली हनुमंताला डोईवरील पर्वतासह जखडून जर्जर केले होते माझ्या गुरूने. वीरभद्राला शरणागत केले,

सूर्याला पराजित केले. असा प्रतापवंत माझा गुरु आहे. आता त्याच्या कृपा आशिर्वादाचा चमत्कार तुला दाखवतो." असे म्हणून शिल्लक राहिलेल्या आम्रफळांवर संजीवनी मंत्र टाकून, स्पर्शास्त्राने ते आंबे पुन्हा झाडावरील सजीव फळात परावर्तीत केले.

हे अजब कृत्य पाहून कानिफनाथ थक्क झाले. अत्यंत गांभीर्याने त्याने स्वतःशीच कबुली दिली की, "हा तपोजेटी खरोखरच महाप्रतापी आहे, त्याची महानता निर्विवाद मान्य करावयास हवी." क्षणापूर्वी आपण क्रुद्ध झालो होतो. राग, अहंकार सोडून कानिफाने गोरक्षनाथाला मिठी मारली आणि म्हणाले; "धन्य, धन्य गोरक्षनाथ! आपण श्रेष्ठ गुरुभक्त आहात; मी भावनेच्या अतिरेकात अधिक उणे काही वक्तव्य केले असेल, तर मनात, अढी न ठेवता क्षमा करावी परंतु ह्या कडव्या प्रसंगातून मला माझ्या गुरूंचा ठाव ठिकाणा माहित झाला. मी आपला आभारी आहे."

यावर गोरक्षनाथ स्नेहभावाने पाठीवरून हात फिरवीत दिलासा देत म्हणाले, "कानिफनाथ झाले गेले विसरून जा! उगीच मनाला क्लेश करून घेऊ नका! खर तर तुमचे माझ्यावर मोठे उपकार झाले आहेत. तुमच्यामुळे मला माझ्यापासून दुरावलेल्या श्रीगुरूंचा ठाव ठिकाणा समजला, आपण एकमेकांना कटू बोललो पण ते हितकारक ठरले आहे. वाईटातून चांगले निष्पन्न होते, ते अशाप्रकारे! चला तर आता आपापल्या गुरुदेवांना भेटण्यासाठी निघू या." दोघांनीही एकमेकांना प्रेमादारांनी नमन करून निरोप घेतला. गोरक्षनाथ स्त्री देशाकडे रवाना झाले.

कानिफनाथांनी, हेलापट्टण नागरीकडे जाण्याचा इरादा निश्चित केला. एकंदरीत झालेल्या बचाबाचीमुळेच अनपेक्षित असा रहस्यभेद स्पष्ट झाला होता. त्यामुळे वाटचालीला एका निश्चित उद्धेशामुळे वेग निर्माण झाला होता. प्रत्येक दिवसागणिक अंतर कमी कमी होत आहे. कानिफनाथ क्रोधाग्नीत जळत होते, ज्याने, श्रीगुरूंना भूमीत गाडले त्याचा नाश केल्याशिवाय राहणार नाही. गुरुमूर्तीना दुःख देणाऱ्या पापी राज्याला जाळून भस्म करीन. केव्हा एकदा राज नगरीत पोहोचतो असे झाले आहे. सपाट्याने मजल दरमजल करीत नगरीच्या सीमेवर येऊन धडकले. जवळच्या वनात डेरे दाखल झाले. आता उद्या सूर्योदय होताच हेलापट्टण!...

महाराज गोपीचंदला वर्तमान कळले की राजनागरी सामीप असलेल्या अरण्यात कानिफनाथ आपल्या शिष्यवृंदासह डेरे दाखल झाले आहेत. त्यांच्या पराक्रमाबद्दलची कीर्ती त्यांना अगोदरपासून माहित होतीच. नाथांच्या स्वागतासाठी राजा स्वतः निघाला. मनात विचार येत होते; माझ्यासारख्या वैभवशाली, पराक्रमी राजाला असाच गुरु योग्य आहे. पूर्णयोगी, ब्रह्मचारी, पराक्रमी वैभवशाली, किर्तीमान राजयोगी कानिफनाथ!...शेकडो शिष्यांचा स्वामी!! असाच गुरु पाहिजे. नाथांच्या स्वागताची मोठी जंगी तयारी करून राजा निघाला, वाटचाल करता करता महामंत्र्याला म्हणाला, "महामंत्रीजी! आमचे भाग्य थोर; म्हणून अशा सिद्ध योगी महाराजांच्या भेटीचा योग आला. आता त्याला गुरु करून ईश्वरभक्ती करण्याचा आमचा मानस आहे. हे गुरुदेव आमच्या वैभवास शोभणारे, तोलामोलाचे, आहेत नाहीतर आमच्या मोतीश्रीनी कसला कंगाल गुरु सुचविला होता. रत्नमाळेत कांचमणी, कल्पतरूच्या वनात बाभळीचे झाड; किंवा चंद्रासमीप काजवयाप्रमाणे विशोभित वाटला असता. मी भूपती असल्यामुळे माझा गुरु सुद्धा भूपती असावा. घाणेरड्या दुर्गंधीत गल्लीबोळात भूतासारखा वावरणारा जालिंदर नावाचा जोगडा; आमच्या मातोश्रीने निवडला होता. बरे झाले; त्यावेळी ऐकले नाही ते. त्याची संगत योग्य नव्हतीच. आता कानिफनाथ हेच गुरु म्हणून माझ्या मनास भावतात."

कानिफनाथांच्या शिबिरात राजा गोपीचंद हात जोडून उभा राहिलेला पाहातच त्यांचा क्रोध उफाळला. परंतु त्यावर विवेकाने मात केली. शांत चित्ताने विचार केला की "जर मी याला आताच शाप देऊन भस्म केले तर श्रीगुरुंचे स्थान कोण दाखविणार? त्यामुळे आधी आपले कार्य साधून घ्यावे. गुरुदेवांच्या भेटीनंतर याला शासन काणे योग्य होईल."

गोपीचंद राजा नाथांचे चरणस्पर्श करीत नम्रपणे म्हणाला, "गुरु महाराज आपल्या दर्शनाने माझा भाग्योदय झाला. आता कृपाशीर्वाद देऊन सनाथ करावे, आपल्यासारखे संत महात्मे; द्या; क्षमा, शांतीची, रत्नभंडारे असतात आपण ज्ञान, वीज्ञान आस्तिक, कर्म जाणकार, षड्विकारावर विजय पावलेले ब्रह्मतदाकार महायोगी असल्याने या विकारी जगात वावरत असूनही अलिप्त आहात, साधकाच्या मनोकामना पूर्ण करणारे कल्पतरू आहात. गुरु महाराज! मला अनुग्रह देण्याची कृपा करावी." राज्याच्या स्तुती सुमनांनी नाथांचा उफाळलेला क्रोध सौम्य झाला. त्याला सन्मानाने आसनावर बसविले. प्राथमिक विचारपूस झाल्यावर नाथ धीर गंभीर वाणीत म्हणाले; "राजन! तू मोठा अपराध केला आहेस, तुझे दैव बलवत्तर म्हणून मी शांत राहिलो अन्यथा तुझ्या प्राणाशी गाठ होती. आता त्वरेने नगरीत चालावे, म्हणजे मग काय ते सांगतो."

यथावकाश सर्वजण राजवाड्यात आले. नाथांना सुवर्णसिंहासनावर बसवून षोड्षोपचारे त्यांची पूजा करण्यात आली. हात जोडून राजा म्हणाला, "योगीमहाराज! आपला अनुग्रह मिळावा, आपले शिष्यत्व स्वीकारण्यासाठी मी आपल्या स्वागताला आलो होतो पण आपण अचानक क्रोधीत झालात, त्यामुळे उत्साहावर विरजण पडले मजकडून काय प्रमाद घडलाय हेच समजत नाही. भयरुपी भुंगा माझे काळीज पोखरत आहे. तरी आपण क्रोध आवरावा. माझ्यावर दया करा, अनुग्रह द्यावा आणि आपला दास म्हणून माझी तिन्ही लोकात कीर्ती करावी."

कानिफनाथ त्यांस उत्तर देतांना म्हणाले; "राजन! तू माझा अनुग्रह मागतोस? अरे; ज्याने मला अनुग्रह दिला त्या माझ्या गुरुस्वामींना तू अश्वविष्ठेत खोल खड्ड्यात गाडून टाकले आहेस. तू शापचा धनी आहेस परंतु तुझा आयुष्याचा दोर बळकट होता, पाठीशी पुर्व पुण्याई होती, म्हणून त्यावेळी श्रीगुरू आणि या क्षणी मी विवेक बाळगला आहे. अन्यथा गुरुदेव जालिंदरनाथांच्या केवळ शापवाणीने तू आणि तुझे राजवैभव भस्म झाले असते. अरे; तेहतीस कोटी देवांना झाडाला उलटे टांगण्याचा पराक्रम त्यांनी केला आहे. मग त्यांच्यासमोर तू कोणत्या झाडाचा पाला आहेस?"

आपण केलेले कृत आठवून राजा भयाने थरथर कापू लागला. त्याच्या देहावर सरसरून काटा आला. नाथांच्या पायावर मस्तक टेकवून दीनपणे विनवणी करू लागला. "महाराज! अज्ञानापोटी अपराध घडला आहे, क्षमा मागतो, दया करा, शरण आलो आहे, या भुतलावर माझ्यासारखा पापी कोणी नाही; तरी ही माझ्यावर मायेच्या ममतेने दया करा. बालकाने ने जाणता, अजाणता कितीही प्रमाद केले तरी माता त्याचे अहित करीत नाही. दया, क्षमा, शांती हे आपले गुणधर्म असल्याने जगाने दिलेले दुःखाचे आघात सोसूनही आपण जगताचे कल्याणाच चिंतीता. घाव घालणाऱ्याला आणि पाणी घालणाऱ्यालाही वृक्ष भेदाभेद नकरता मायेने शीतल छायाच देतो; पापी आणि पुण्यवंतात भेदाभेद नकारता नदी जीवनदानाने त्यांची तृष्णा शमाविते. घरात उपद्रवासाठी शिरलेल्या तस्करांनासुद्धा दीपक प्रकाश देतो. त्याप्रमाणे मी पापी आहे पण आता आपल्या चरणांवर शरणागत असल्याने क्षमा करून या पापातून मुक्त करा." कानिफनाथ म्हणाले; "ठीक आहे, चिंता करू नको, योग्य मार्ग काढू."

ही चर्चा सेवकांनी ऐकली त्यांनी राजमातेला सकल वृतांत कथन केले. सेविका म्हणाल्या, “राजमाताजी! आपले श्रीगुरू जालिंदरनाथ यांना महाराज गोपीचंदाने दहा अकरा वर्षांपूर्वी भूमीत गाडले आहे, आता त्यांचा शिष्य कानिफनाथ येथे आला आहे तो सुद्धा महाप्रक्रमी असून भयंकर संतप्त आहे. महाराजांनी चूक कबुलही केली आहे. राजांचे काही खरे नाही. पुढचा वृतांत कळताच आपल्या कानावर घालू.” असे म्हणून सेविका अधिक बातमी मिळविण्यासाठी गेल्या.

राजमाता मैनावतीचे हृदय विदग्ध झाले, गोपीचंदाच्या कृत्यामुळे क्रोध, दुःख, वियोग, प्रेम, ममता अशा भावनांचा कल्लोळ उठला. तिथे भयभीत झालेला राजा नाथांची सेवा करीत होता. दुर्वास ऋषींच्या सेवेसाठी कौरव राजा जसा तत्परतेने कार्यरत होता तसा राजा गोपीचंद नाथांची सेवा करीत होता.

रात्री राजा त्याचा महलात आल्याबरोबर राजमातेने त्याला बोलून घेतले. राजाने इत्यंभूत घडलेली गाथा आणि प्राप्त परिस्थिती कथन केली आणि म्हणाला; “मातोश्री! आता आपणच मला ह्यातून वाचवा, कानिफनाथांकडे जाऊन युक्तीप्रयुक्तीने काही मार्ग काढून माझा जीव वाचवा.” गोपीचंद; दुःखातिरेकाने खचून, मातेच्या कुशीत तोंड खुपसून हमसाहुमशी रडू लागला.

राजमाता विमनस्क होऊन पुत्रावरील प्राण संकटातून अभय मिळावे म्हणून नाथांच्या शिबिरात आली. नाथांच्या समीप असलेल्या आसनावर बसत म्हणाली, “गुरुबंधू कानिफनाथा! मी राजमाता मैनावती, नाथपंथी असून गुरुदेव जालिंदरनाथांची शिष्या आहे.” हे ऐकून नाथ कडाडले, “बरे केलेत! श्रीगुरु म्हणून जालिंदरनाथांचे नाव सांगतेस; आणि त्यांना तर अश्व विष्ठेत जिवंत गाडले आहेस? हीच का तुझी गुरु निष्टा?”

“बंधुराया! हे मला अगोदर माहित नव्हते, आजच समजले आहे.” असे म्हणून तिने स्वतःचा सर्व भूतकाळ कथन केला. पुढे म्हणाली; “माझ्या नकळत गोपीचंदाने हा अपराध केला आहे परंतु एखाद्याने केलेली घोड चूक सांभाळून घेणे हे सज्ञांचे कर्तव्य असते. त्याला क्षमा करून सुधारण्याची संधी द्यावी आपण स्वतः गुरु देवांना युक्तीने बाहेर काढावे. त्यांचा क्रोध आपणच शांत करू शकता. गोपीचंदाने त्यांना बाहेर काढण्याचा प्रयत्न केला तर गुरुजी शापाने भस्म करतील. मी आपली गुरुभगिनी आहे आणि गोपीचंद आपला भाचा आहे. मी आपल्यापुढे पदर पसरून याचना करते की गोपीचंदाचे प्राण वाचवा, तसेच त्याला नाथपंथात समावून किर्तीमान करावा.” अशा प्रकारे नाथांना धर्मसंकटात टाकून ठाम पणे होकार प्राप्त करून राजमाता महालात परतली. अभय मिळाल्याचे सांगून तिने गोपीचंदाचे भय कमी केले.

श्रीगुरूंना दृष्मान करायचे, राज्याचे प्राण वाचवायचे, त्याला अनुग्रह मिळवून द्याचा आणि धर्मभगिनीला दिलेल्या वचनाला जागायचे; हे सगळे कोणत्या युक्तीने करावे याबाबत कानिफनाथांचे अहोरात्र विचारमंथन सुरु होते.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने दुष्ट स्वप्नांचा नाश होतो.